क्रमांक.एमसीटी ०३९८/प्र.क्र.१८/परि-५,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक : २९ एप्रिल, २००४

विषय : प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई
या रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार सांभाळल्याबाबत
विशेष वेतन मंजूर करणेबाबत

ज्ञापन :- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना असे कळविण्यात येते की, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई येथील प्रबंधक श्रीमती राधा रामनाथन यांच्या स्वेच्छानिवृत्तीमुळे दि.१.५.१९९८ पासून रिक्त झाले आहे. सदर रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार श्री. सुरेश पी. पाटील, प्रबंधक-२ यांचेकडे सोपविण्यात आला आहे. श्री. सुरेश पी. पाटील यांनी सदर रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार दि.२.५.१९९८ ते ३०.४.१९९९ पर्यंत पाहिल्याबद्दल शा.नि., वित्त विभाग क्र.वेतन १४९१/प्र.क्र.१२८/९१/सेवा-३, दि. २९.३.१९९४ मधील विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांनी विशेष वेतन मंजूर केले आहे.

२. शासन निर्णय, वित्त विभाग दि.२९.३.९४ नुसार पद प्रथम रिक्त झाल्यापासून दुस-या वर्षाचा अतिरिक्त कार्यभाराचे विशेष वेतन मंजूर करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास असल्याने या अधिकारानुसार श्री. एस. पी. पाटील, प्रबंधक-२, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण यांना प्रबंधक-१ या रिक्त पदाचा दुस-या वर्षासाठी अतिरिक्त कार्यभार दि.२.५.१९९९ ते दि.३०.४.२००० पर्यंत पाहिल्याबद्दल व सदर कालावधीचे १०% विशेष वेतन (रजा कालावधी वगळून) त्यांना देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. प्रमाणपत्र देण्यात येते की, दुस-या पदाचा अतिरिक्त कार्यभार धारण केला आहे ते पद मुख्य पदाला प्रत्यक्षपणे दुय्यम नाही. कामाच्या आणि जबाबदा-यामध्ये विशिष्ट वाढ झालेली आहे आणि दुसरे पद स्वतंत्र असून त्या पदाला स्वतंत्र अशी अधिकारीता आहे.

४. यानिमित्त होणारा खर्च "२०४१-वाहनावरील कर-८००-इतर खर्च-०० (०१), मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई" या लेखाशिर्षाखाली वर्ग करण्यात यावा व तो सन २००४-२००५ या वर्षाच्या मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आ.बा. डमाळे
( आ. बा. डमाळे )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१,
अध्यक्ष/प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई
श्री. सु. प. पाटील, अतिरिक्त प्रबंधक मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई,
निवड नस्ती .